**वाटूर फाटा, परतूर जिल्हा जालना येथे पोलीसांनी जप्त केलेला ३० टन तांदूळासंदर्भात उप आयुक्त (पुरवठा), छत्रपती संभाजीनगर यांची एक सदस्यीय चौकशी समिती नियुक्त करणेबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : विसप्र-४९२५/प्र.क्र.९४/नापु-३१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २३ एप्रिल, २०२५.

<u>प्रस्तावना :-</u>

वाटूर फाटा, परतूर जिल्हा जालना येथे पोलीसांनी जप्त केलेल्या ३० टन तांदूळाबाबत दि.१७/०३/२०२५ रोजी विधानसभा तारांकित प्रश्न क्रमांक ४५५७ वरील सभागृहातील तारांकित प्रश्नाच्या चर्चेस अनुसरुन मा. राज्यमंत्री (अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण ) यांनी उत्तर दिलेले आहे. सदरील उत्तराच्या माहितीच्या अनुषंगाने मा. अध्यक्ष, विधानसभा यांनी अधिक माहिती (ॲक्शन टेकन रिपोर्ट) पुढील अधिवेशनात सभागृहाच्या पटलावर ठेवण्यात यावी असे निर्देश दिलेले आहेत. सदरील निर्देशानुसार प्रकरणाची अधिक चौकशी करणे आवश्यक आहे, त्यासाठी उप आयुक्त (पुरवठा) छत्रपती संभाजीनगर यांचे अध्यक्षतेखाली "एक सदस्यीय चौकशी समिती" नेमण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

उपरोक्त प्रस्तावनेत नमूद केलेल्या बाबीच्या पार्श्वभूमीवर दि. ०२/०२/२०२५ रोजी वाटूर फाटा, परतूर जिल्हा जालना येथे पोलीसांनी ३० टन तांदूळाचा ट्रक जप्त केला या जप्त केलेल्या तांदळाबाबत सखोल चौकशी करण्यासाठी "उप आयुक्त (पुरवठा), छत्रपती संभाजीनगर" यांची एक सदस्यीय चौकशी समिती नियुक्त करण्यात येत आहे. सदर चौकशी समितीने खालील बाबीसह प्रस्तुत प्रकरणाची सखोल चौकशी करावी.

१. सार्वजनिक वितरण प्रणालीद्वारे वितरीत करण्यात येणारे तांदूळाचे माहे डिसेंबर, २०२४, जानेवारी, २०२५ व फेब्रुवारी, २०२५ चे भारतीय खाद्य महामंडळ यांनी वितरीत केलेल्या तांदूळाचे नमुने व संबंधित जिल्हा प्रतिनिधीकडे राखून ठेवलेले नमुने यांची पडताळणी करुन अहवाल शासनास सादर करावा.

२. अटक करण्यात आलेल्या आरोपीविरुध्द यापूर्वी असे गुन्हे नोंदविण्यात आले आहेत काय ?

३. जप्त केलेला तांदूळ हा नागपूर येथे कोणाला पोहोच करण्यात येणार होता ? तसेच, सदर तांदूळ कोणाच्या मालकीचा होता ? कोणाकडून उचल करण्यात आला होता.

४. याबाबत पोलीस अधिक्षक, बीड तसेच जालना यांचेकडून माहिती घेण्यात यावी.

५. जप्त केलेल्या तांदूळाचे नमुने शासनमान्य प्रयोगशाळेत तपासणी करुन सदरहू नमुने हे सार्वजनिक वितरण प्रणालीद्वारे वितरीत तांदूळाच्या नमुन्याशी जुळतात काय ? याबाबत अहवाल सादर करावा.

६. उक्त प्रकरणाच्या अनुषंगाने महत्वाच्या त्रुटी / उणीवा/संदिग्धता निदर्शनास आल्या आहेत काय ?

वरील बाबींसह सदर प्रकरणाची सखोल चौकशी करुन सविस्तर अहवाल सर्व संबंधित कागदपत्रांसह शासनास एक महिन्यात सादर करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०४२३१५५५५५४८०६ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

TATOBA MARUTI KOLEKAR

Digitally signed by TATOBA MARUTI KOLEKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=Food Civil Supplies and Consumer Protection Depart, 2.5.4.20=f6809ddecc0e0507860e37e9935ab3a7013510f4fe04fad27512588a0bc8e15f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9915405908628d01955f3675acc122f51e0c39f63f7cc88eec49cd05616991fd, cn=TATOBA MARUTI KOLEKAR
Date: 2025.04.23 15:56:38 +05'30'

**(ता. मा. कोळेकर)**
**सह सचिव,**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**

**प्रत,**

१) मा. राज्यपालांचे सचिव.
२) मा. अध्यक्ष, विधानसभा यांचे सचिव.
३) मा. मुख्यमंत्री, यांचे अप्पर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव.
४) मा. उपमुख्यमंत्री तथा मंत्री अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे अप्पर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव.
५) मा. राज्यमंत्री, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे खाजगी सचिव.
६) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन.
७) प्रधान सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) विभागीय आयुक्त, छत्रपती संभाजी नगर विभाग, छत्रपती संभाजी नगर.
९) उपायुक्त (पुरवठा) छत्रपती संभाजी नगर, विभागीय आयुक्त कार्यालय, छत्रपती संभाजी नगर.
१०) जिल्हाधिकारी बीड/जालना.
११) पोलीस अधिक्षक बीड/जालना.

१२) सह सचिव (नापु ३१) अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग.
१३) अवर सचिव (नापु ३१) अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग.
१४) कक्ष अधिकारी (नापु ३१) अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग
१५) जिल्हा पुरवठा अधिकारी बीड/जालना.
१६) निवड नस्ती (नापु ३१).